# नेल्सन मंडेला

लेः जिन्नी हॉलंड, चित्रः माइक व्हाइट



# नेल्सन मंडेला

लेः जिन्नी हॉलंड, चित्रः माइक व्हाइट

मराठीः प्रभाकर नानावटी



1994 साली नेल्सन मंडेला दक्षिण आफ्रिकेचे राष्ट्रपती झाले. ते आपल्या देशाच्या व तेथील जनतेच्या स्वातंत्र्यासाठी कित्येक वर्षे लढले. त्यांचे वडील थेंबू या आदिवासी जमातीचे. त्यांचे पूर्वज थेंबू या आदिवासी जमातीचे नेते होते. मंडेलांच्या जन्माआधीच गोऱ्या लोकांनी आफ्रिकेतील मूळ जमातींच्या जमीनी बळकावून  व तेथील नेत्यांना हुसकावून स्वतःच राज्य करायला लागले.



गोऱ्यानी स्वतःजवळ सर्व सुपीक जमीनी ठेवून घेतल्या.  त्यामुळे इतर आफ्रिकन लोकांना गरिबीत दिवस काढावे लागले. गोरेच तेथील सर्व कायदे करत होते. त्यामुळे दोन वेळच्या अन्नासाठी काळ्या आफ्रिकनांना त्यांच्यापुढे हात पसरावे लागत होते. मंडेला यांना या गोऱ्यांचे अन्यायपूर्ण राज्य संपवून एक न्यायी राज्य बनवण्यासाठी 30 वर्षे लागली.





लहानपणी नेल्सन मंडेला यांना एकच खोली असलेल्या गोलाकार झोपडीमध्ये झोपावे लागत होते. त्याचे आई – वडील व तीन बहिणी त्याच खोलीत झोपत होते. प्रत्येकाला स्वतःचे अंथरूण होते. त्याच्या आईकडे वारश्याने मिळालेल्या तीन झोपड्या होत्याः एक झोपण्यासाठी, दुसरे स्वयपाकासाठी व तिसरे धान्य साठवण्यासाठी. इतर बायकाप्रमाणे हिच्याकडेही गुरं बांधण्यासाठी स्वतंत्र जागा होती व त्याभोवती भाजीपाल्याचे पीक घेतले जात होते.

या जमातीचे मुख्य आहार म्हणजे एक प्रकारचा मका. नेल्सनची आई मक्याचे पीठ दळून भाकरी करायची. पीठ दळण्यासाठी त्याच्या बहिणी मदत करत होते. नेल्सन गाई-गुरांना चारण्यासाठी जंगलात घेवून जात होता.





कधीतरी नेल्सन आपल्या सवंगड्याबरोबर शिकारीला जात होता. पक्ष्यांची शिकार मिळाल्यास त्याचे पंख शिजवून ते सर्व खात होते. नेल्सनचे एका प्रकारचे समाधानी आयुष्य होते. तो दहा वर्षाच्या असताना त्याचे वडील अकस्मातरित्या वारले.

त्यानंतर तो आपल्या जोंगिंताबा नावाच्या चुलतभावाकडे रहायला गेला. तो एका जमातीचा नेता होता. त्यानी याच्या देखभालीची व त्याला शाळेत शिकवण्याची जबाबदारी घेतली.
परंतु त्यानी जे शिकले ते त्याला शाळेपासून मिळालेले नव्हते. त्या काळी त्याच्या वयाचे तरुण वरिष्ठांचे बोलणे मनःपूर्वक ऐकत होते. थेंबू जमातीचे कित्येक जण जोंगिंताबाला भेटण्यासाठी येत असत.





भेटीला येणाऱ्यामध्ये ज्वेलिभांगिले जोई नावाचा एक नेता होता. तो जोंगिंताबाला थेंबू जमातीच्या नेत्यांच्या शौर्याचे व गोऱ्यांच्या बरोबर केलेल्या लढाईच्या गोष्टी सांगत असे. नेल्सन या गोष्टी कान टवकारून ऐकत होता. थेंबू जमातीच्या लोकांकडे सुपीक जमिनी का नाहीत याचे रहस्य त्याला हळूहळू कळू लागले. इतकी गरिबी यापूर्वी कधीच नव्हती, हेही त्याच्या लक्षात येऊ लागले. या सर्वांचे जीवन सुधारण्यासाठी भरपूर कष्ट घ्यावे लागतील याची त्याला कल्पना आली.



1941मध्ये नेल्सन जोहान्सबर्गला पोचला. दक्षिण आफ्रिकेतील ते सर्वात मोठे शहर होते.  तेथील सोन्याच्या खाणीत त्याला पोलीसाची नोकरी मिळाली. यापूर्वी आपली जमात सोडून बाहेर कधीच राहिलेला अनुभव त्याला नव्हता. गोऱ्या लोकांच्या कायद्याप्रमाणे वेगवेगळ्या जाती जमातीसाठीच्या राखीव जागेतच जमातीतल्या लोकांना रहावे लागत असे.  गोरे लोक वर्णभेदाला प्रोत्साहन देत होते.  गोऱ्यांच्यासाठी मोठमोठी घरं होती. व त्यांच्यासाठीच असलेल्या ठिकाणी ते रहात होते. परंतु त्यांच्या घरी काम करणारे सर्व नोकर चाकर काळेच होते.



काळ्या लोकांना शहरात काम करण्यासाठी पर्मिट घ्यावे लागत असे. त्या लोकांचे राहण्याचे ठिकाणही वेगळे होते. त्या जमीनीत काहीही उगवत नव्हते. वाळवंटासारखी कोरडी जमीन त्यांच्या वाटेला आली होती. त्यांच्या राहत्या ठिकाणी पाणी, वीज किंवा टेलिफोन इत्यादी मूलभूत सुविधा नव्हत्या. काळ्या लोकांना मताधिकार नव्हता. गोऱ्यांनी आपल्या हितासाठी व सुरक्षेसाठी अशा प्रकारच्या अन्यायपूर्ण कायदे केले होते.  त्यामुळे प्रत्येक 6-7 काळ्यांच्या मागे एक गोरा माणूस होता.

शहराच्या बाहेर कामावर जाणाऱ्यांचे फार हाल होत होते. काम करण्यासाठी पर्मिट घ्यावे लागत असे. पर्मिट असलेल्यांना पहाटे उठून शहर सोडावे लागत होते. कामावरून परत येताना कामगार गाडी व बस पकडून रात्री उशीरा राहत्या ठिकाणी पोचत होते. परत दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे उठावे लागत होते. हातात पडणारी मजदूरी फारच कमी असे. त्यातून दोन वेळच्या जेवणाचा खर्चही भागत नसे.



काही दिवसानंतर नेल्सन मंडेला विटवाटर्सरँड विद्यापीठात पुढील शिक्षणासाठी गेले. या ठिकाणी कुठलाही भेदभाव नव्हता व सर्व जाती जमाती, वंश व रंगाचे विद्यार्थी मिळून मिसळून शिकत आहेत, हे त्यांच्या लक्षात आले. तेथील विद्यार्थी दक्षिण आफ्रिकेचे सरकार कशा प्रकारचे असावे याबद्दल चर्चा करत असत. जास्तीत जास्त गोरे मात्र गोरेच सरकार चालवण्यास योग्य असे निष्कर्ष काढत असत. परंतु इतर मात्र त्यांच्या या मताशी कधीच सहमत होत नसत. सर्व रंगाच्या जाती जमातींना समान अधिकार असावेत असे त्यांना वाटत होते. .



दक्षिण आफ्रिकेच्या जनतेवरील अन्याय दूर करण्यासाठी संपूर्ण आयुष्य देईन अशी प्रतिज्ञा नेल्सन मंडेला यानी केली. 1944 साली वयाच्या 26व्या वर्षी ते आफ्रिकन नॅशनल काँग्रेस या संघटनेचे सदस्य झाले. त्याच काळी त्यानी इव्हेलिन या पहिल्या पत्नीशी लग्न केले.



1947साली त्यांची युथ लीगचे सचिव म्हणून निवड झाली. 1951मध्ये ANCच्या आंदोलनाचे त्यानी नेतृत्व केले. गोऱ्यांच्या अन्यायाचे बळी ठरलेल्या आफ्रिका व भारतीय वंशाच्या जनतेनी या आंदोलनात उत्स्फूर्तपणे भाग घेत काम करण्यास नकार दिला.

1951मध्ये मंडेला युथलीगचे अध्यक्ष झाले.



अन्यायकारक कायद्याच्या विरोधात आवाज उठवल्याबद्दल व विरोध केल्याबद्दल मंडेलासहित 20 कार्यकर्त्यांना पोलीसांनी पकडून त्यांच्यावर खटला भरला. परंतु यात कुठल्यही प्रकारची हिंसा झाली नव्हती म्हणून कोर्टाने त्यांना निर्दोष सोडून दिले.

यानंतर सामान्य माणसंसुद्धा गोऱ्यांच्या पक्षपाती कायद्यांचा विरोधात आवाज उठवू लागले. काही घटनेत गोरे व काळे लोक जखमी होत होते. त्यामुळे मंडेला यांचे तोंड कायम बंद करण्यासाठी सरकार त्यांच्या संघटनेवर बंदी घातली व त्यांच्यावर अनेक बंधनं लादली. त्यामुळे मंडेला व ANC हरल्या असे जनतेला वाटू लागले.

परंतु मंडेला यांनी आपले संघर्ष तसेच चालू ठेवले. समान हक्कासाठी आंदोलन करताना त्यांना दुसऱ्यांदा जेलमध्ये पाठवण्यात आले. 1956मध्ये त्यांच्यासकट 156 आंदोलकावर राजद्रोहाचे आरोप ठेवण्यात आला राजद्रोह म्हणजे सरकार उलथवण्याचे व सरकारच्या विरोधात कार्य करण्याचे प्रयत्न. मंडेला व इतर 29 जणांना या खटल्यात मृत्यदंडाची शिक्षा देण्यात आली. परंतु वरच्या कोर्टाने त्यांना आरोपमुक्त केले. व सरकारला या सर्व 156 जणांना सोडून द्यावे लागले.





नेल्सन मंडेला व पत्नी इव्हेलिनबरोबरील वैवाहिक जीवन ठीक चालत नव्हते. 1958साली त्यांनी विन्नी मदिकिजेलाशी पुनर्विवाह केला. विन्नी आफ्रिकेच्या स्वातंत्र्य संग्रामात हिरीरीने भाग घेत होती. मंडेला यांच्या खांद्याला खांदा देत तिने संघर्ष केले.



1960साली एक भयंकर घटना घडली. शार्पव्हिल्ले या शहरातील जनता अन्यायकारक कायद्याच्या विरोधात शांततापूर्ण आंदोलन करत असताना पोलीसांनी त्यांच्यावर गोळीबार केला. त्यात 69 जण मेले. 180 पेक्षा जास्त बायका-मुलं गंभीररित्या जखमी झाले.

यानंतर मात्र दक्षिण आफ्रिकेच्या शासनाने ANC  संघटनेवर संपूर्ण बंदी घातली. ANCचे सदस्य होणेसुद्धा कायद्याच्या विरोधात आहे अशी आज्ञा काढली. नेल्सन मंडेला यांची तुरुंगात रवाना करण्यात आली. नेल्सन मंडेला यांनी शार्पव्हिल्लेच्या आंदोलनाला जाहीर पाठिंबा दिला म्हणून त्यांना जेलमध्ये असतानाच शिक्षा सुनावली.    मंडेला यांची जेलमधून सुटका झाल्यानंतर त्यांनी एका नव्या पक्षाची स्थापना केली. ही संघटना सरकारच्या अन्याकारक नीतीच्या विरोधात कठोरपणे संघर्ष करणारी होती. वर्णभेद नीतीच्या विरोधात संघर्ष करत अनेक सरकारी इमारती उध्वस्त केल्या. या आंदेलनात जीवित हानी होणार नादी याची काळजी घेतली. परंतु हे आंदोलन शांततापूर्ण नव्हते.



मंडेला पोलीसांचा ससेमिरा चुकवत होते. वेष बदलून टॅक्सी ड्रायव्हर म्हणून काम करू लागले. मात्र 1962मध्ये त्यांना पकडण्यात आले. यावेळी त्यांना प्रिटोरियाच्या जेलमध्ये ठेवण्यात आले. त्यांच्यावर खटला भरून त्यांना पाच वर्षाची सक्षम कारावासाची शिक्षा सुनावण्यात आली. ते जेलमध्ये असतानाच कोर्टात नेवून अजून एका खटल्यात त्यांना आजन्म कारावासाची शिक्षा सुनावण्यात आली.





13 जून 1964 रोजी मंडेला यांना रॉबेन आयलँडच्या जेलमध्ये ठेवण्यात आले. एका स्वतंत्र खोलीत पोलीसानी त्याला ठेवले. राजकीय कैद्याप्रमाणे दिवसा व रात्री बंद खोलीत त्यांना एकटेच राहावे लागले. काही दिवसांनी त्यांना बाहेर हिंडण्या-फिरण्याची परवानगी देण्यात आली. बाहेर असताना त्यांना पोस्टाच्या जाड पिशव्या शिवण्याचे काम देण्यात आले. शेजारच्या कैद्याशी बोलल्यास त्या दिवसाचे जेवण मिळत नसे.

नेल्सन मंडेला जेलमध्ये असताना दक्षिण आफ्रिकेतील जनता संप, धरणे यातून विरोध व्यक्त करत होती. या आंदोलनात कित्येकांचे बळी गेले. अनेकांना तुरुंगवासाची शिक्षा झाली. संपूर्ण जगाचे लक्ष मंडेलांच्या आंदोलनाकडे होते. मंडेलांना जेलमध्ये पकडून ठेवल्याबद्दल संपूर्ण जग संताप व्यक्त करत होते. त्यांनासुद्धा दक्षिण आफ्रिकेतील वर्णभेद संपायला हवे असे वाटत होते. अनेक राष्ट्रं मंडेलाना तुरुंगातून सोडवण्यासाठी प्रयत्न करत होत्या. अनेक विकसित राष्ट्रं दक्षिण आफ्रिकेच्या सरकारला नीती बदलण्यासाठी आग्रह धरत होते.






दक्षिण आफ्रिकेला ऑलिंपिक सामन्यात भाग घेण्यास मनाई करण्यात आली. 1986मध्ये अमेरिकेने एक विशेष कायदा पास करून अमेरिकेच्या भूभागावर दक्षिण आफ्रिकेच्या विमानांना व जहाजाना प्रवेश नाकारला. त्याचप्रमाणे त्याच्यांशी असलेले व्यापार संबंध तोडण्यात आले.
मंडेलांच्या 70व्या वाढदिवशी एक भव्य संगीत समारोहाचे आयोजन करण्यात आले. जगभरच्या टीव्हीवर दाखवण्यात आले. आता मात्र दक्षिण आफ्रिकेच्या सरकारला माघार घेतल्याशिवाय गत्यंतर उरला नाही. जगाच्या मताला मान्यता देणे भाग पडले.



1989मध्ये एफ.ई.डब्लू डिक्लार्क राष्ट्राध्यक्ष म्हणून निवडून आले. दक्षिण आफ्रिका एक चांगला देश होण्यासाठी ते प्रयत्न करू लागले. एके दिवशी नेल्सन मंडेलांना जेलमधून मुक्त करण्याची घोषणा त्यांनी केली.
11 फेब्रुवरी 1990 रोजी नेल्सन मंडेला जेलमधून बाहेर आले. तेव्हा त्यांचे वय 71 वर्षे होती. तोपर्यंत त्यांना 10000 दिवस तुरुंगवास भोगला होता.



तुरुंगातून बाहेर आल्यानंतर त्यांनी आपली पत्नी विन्नीची भेट घेतली. मंडेलांच्या त्यापुढील जीवनात विन्नी सतत त्यांच्या बरोबर होती. सर्व जगाला मंडेलाच्या सुटकेमुळे आनंद झाला. मंडेला यांची सुटका म्हणजे दक्षिण आफ्रिकेचे अन्यायपूर्ण वर्णभेद नीती सोडण्याचे चिन्ह. मंडेलांच्या सुटकेच्या दिवशी संपूर्ण दक्षिण आफ्रिका रस्त्यावर येऊन नाचत होती.

एफ.ई.डब्लू डिक्लार्क नेल्सन मंडेला व **ANC** बरोबर काम करू लागले. दोघानी मिळून नव्या सरकारच्या स्थापनेसाठी राष्ट्राध्यक्षाच्या निवडणुकीची व्यवस्था केली. 1994मध्ये मंडेला निवडणुकीसाठी उभे राहिले.    मतं देण्यासाठी लाखो लोक भर उन्हात उभे होते. मंडेला निवडणूक जिंकून राष्ट्राध्यक्ष झाले. आणि एफ.ई.डब्लू डिक्लार्क उपराष्ट्रपती म्हणून पदभार संभाळला.





राष्ट्राध्यक्ष मंडेला यांनी जगप्रवासात असताना अमेरिकेचे अध्यक्ष क्लिंटन यांची भेट घेतली. आपल्या राजवटीत त्यांनी गोरा काळा असे वंशभेद न करता सर्वांना समान संधी दिली. शांतीचा पुरस्कार केला. दक्षिण आफ्रिकेची जनता सुखी व्हावे यासाठी ते प्रयत्न करू लागले.  सर्वांना मताधिकार दिले. देशभरातील कुठेही जमीन विकत घेण्याचे व विकण्याचे हक्क सर्वांना मिळाले. मालमत्तेचे हक्क मिळाले. सरकारी नोकरीतील वंशभेद काढून टाकण्यात आले. खऱ्या अर्थाने मंडेला व दक्षिण आफ्रिका मुक्त झाली.

# महत्वाचे दिवस

| | |
|---|---|
| 1918 | दक्षिण आफ्रिकेतील ट्रांन्सकी येथे जन्म |
| 1942 | साउथ आफ्रिका विद्यापीठातून वकीलीची पदवी . |
| 1944 | आफ्रिकन नॅशनल काँग्रेस (ANC) मध्ये प्रवेश |
| 1956 | राजद्रोहाच्या आरोपाखाली 155जणाबरोबर तुरुंगवास |
| 1958 | नोज्मो विनिफ्रेड मादिकिजेला बरोबर विवाह |
| 1960 | 21 मार्च रोजी शार्पव्हिल्ले येथे शांतपणे विरोध करणाऱ्यावर गोळीबार. ANC वर प्रतिबंधक आज्ञा. मंडेला यांची मित्रासहित जेलमध्ये रवाना. |
| 1961 | मंडेला यानी नव्या पक्षाची स्थापना केली. सरकारी इमारतीची मोडतोड केल्याचा आरोप . |
| 1962 | मंडेला यांना पाच वर्षाची सश्रम तुरुंगवासाची शिक्षा |
| 1964 | इतर आठ जणाबरोबर आजन्म कारावासाची शिक्षा |
| 1990 | 27 वर्षानंतर जेलमधून सुटका. ANC अध्यक्ष म्हणून निवड |
| 1994 | राष्ट्राध्यक्षपदी निवड |
| 1999 | नोबल पारितोषकानी सन्मानित |
| 2013 | मृत्यु |